201102142034140001

**पुणे शहर महानगरपालिका**
ए.सी.बी. ने मागणी केलेल्या अधिकारी कर्मचारी यांच्यावर अभियोग दाखल करण्यास सक्षम प्राधिका-यास मान्यता देण्यासाठी निर्देश.

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक- पीएमसी३०१०/संक्र१६४६/प्रक्र५६३/१०/नवि-२२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- ९ फेब्रुवारी,२०११.

वाचा : १) आयुक्त, पुणे महानगरपालिका,पुणे यांचे पत्र क्रमांक-मअउआ/से/२६७७, दिनांक १/१०/२०१० व त्या सोबतचे स्थायी समितीचे ठराव- स्थायी समिती ठराव क्रमांक- १११९, दिनांक ८/१२/२००९ आणि ठराव क्रमांक १३६३,दिनांक १२/१/२०१०.
२) अपर पोलीस अधिक्षक, महासंचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो, महाराष्ट्र राज्य त्यांचे पत्र क्रमांक- तपास/३४/पुणे/२००७/८२७२,दि.११/१०/२००९.

**प्रस्तावना-**

अपर पोलीस अधिक्षक,महासंचालक, ॲन्टीकरप्शन ब्युरो यांचे पत्रान्वये केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने आयुक्त, पुणे शहर महानगरपालिका, पुणे यांनी पुणे महानगरपालिकेतील श्री. लक्ष्मण डामसे,उपायुक्त, श्री.प्रदीप भालचंद्र नाईक,सहाय्यक अभियंता, श्री.अजय दत्तात्रय वायसे, कनिष्ठ अभियंता यांचेविरुध्द लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडून केलेल्या तपासाअंती अभियोग दाखल करण्यास मंजूरी देण्याचा प्रस्ताव स्थायी समिती मार्फत मुख्य सभेकडे सादर केलेला आहे. या प्रकरणी पुणे शहर महानगरपालिकेकडून निर्णय तत्परतेने होत नसल्याने तसेच सदर प्रकरण प्रलंबित राहत असल्यामुळे आयुक्तांनी मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९चे कलम ४४८ अन्वये योग्य ते आदेश देण्याची विनंती संदर्भाधिन पत्रान्वये शासनान केलेली आहे. त्या अनुषंगाने शासनाने विचारांती पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.-

**शासन निर्णय :**

ॲन्टी करप्शन ब्युरो यांचेकडून प्राप्त शिफारशी आधारे आयुक्तांनी सादर केलेल्या प्रस्तावावर ब-याच कालावधीपासून स्थायी समिती व सक्षम प्राधिकारी यांची मान्यता प्राप्त होत नसल्याने या प्रकरणी कलम ४४८ अन्वये निर्देश देण्याचा प्रस्ताव आयुक्तांनी सादर केला आहे.

आयुक्तांचे प्रस्तावातील तपशील विचारात घेऊन, "पुणे महानगरपालिकेकडील श्री.लक्ष्मण रामभाऊ डामसे, उपायुकत (गवानि), श्री.प्रदीप भालचंद्र नाईक,सहाय्यक अभियंता, श्री.अजय दत्तात्रय वायसे, कनिष्ठ अभियंता यांच्याविरुध्द लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडून करण्यात आलेल्या तपासाअंती अभियोग दाखल करण्यास, मान्यता देण्याच्या विषयाबाबत स्थायी समिती व सक्षम प्राधिकारी यांनी सदर आदेश महानगरपालिकेस प्राप्त झाल्यापासून ३० दिवसांत निर्णय घ्यावा, असे निर्देश मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ च्या कलम ४४८(१) अन्वये प्राप्त अधिकारात देण्यात येत आहेत.

२. सदर निर्देश आयुकत, पुणे शहर महानगरपालिका यांनी सर्व संबंधितांचे निदर्शनास आणावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( सुनिल कोठेकर )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
२) मा.प्रधान सचिव, नगर विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक
३) आयुक्त, पुणे शहर महानगरपालिका, पुणे.
४) उपआयुक्त (सेवकवर्ग), पुणे शहर महानगरपालिका, पुणे
५) नगर सचिव, पुणे शहर महानगरपालिका, पुणे.
६) अपर पोलीस अधिक्षक, महासंचालक, ॲन्टी करप्शनब्युरो, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
७) कक्ष अधिकारी, (संगणक शाखा), नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
८) निवड नस्ती (नवि २२)